( २५ )

ऐसा पूर्वं ज्ञानानुभव घेवोनी । वामदेव मुनी गर्भीं बोले ॥ १ ॥
देहभेदा तोडीं आत्मरूपा जोडीं । सर्वानंदगोडी घे हो मुक्त ॥ २ ॥

( २६ )

होतां हे विरक्ती । विचार करीती । भजावा म्हणती । कोण हा आत्मा ॥ १ ॥
एक देहीं दिसे एक हे अवघें । ऐसे होत दोघे आत्मे येथ ॥ २ ॥
यांपैकीं कोणाची कीजे उपासना । जो जन्ममरणा शीघ्र वारी ॥ ३ ॥
ऐशा विचारानें तयां होय बोध । भेद जो विविध त्या बाधिती ॥४॥

( २७ )

जीव जेणें रूपा पाहे । जेणें शब्द ऐकताहे ॥ १ ॥
जेणें गंधा हुगे जीव । जेणें बोले शब्द सर्व ॥ २ ॥
कडू गोड जेणें जाणें । मनबुद्ध्यादिकें शरीं ॥ ३ ॥

( २८ )

हेंचि सर्व हो प्रज्ञान । त्वंपदार्थलक्ष्य जाण ॥ १ ॥
इंद्रादीक देव पंचभूतें जीव । प्रज्ञाना पासाव उद्भवती ॥ २ ॥
प्रज्ञा पाळी सर्वां शेखीं त्यां संहारी । मायावीचे परी वेगळी स्वयें॥३॥
तेंचि ब्रह्म होय तत्पदलक्ष्यार्थ। दों पदांचा होय लक्ष्यार्थ हा ॥ ४ ॥

( २९ )

आहे सामानाधिकरण्य । दोनी पदांचें ह्या जाण ॥ १ ॥
अन्योन्यभेदवारण । हो विशेष्य विशेषण ॥ २ ॥
जीव तोचि हो प्रज्ञान । तेंचि एक ब्रह्म जाण ॥ ३ ॥

( ३० )

ऐसें हें श्रवण याचेंचि मनन । कीजे मग ध्यान निरंतर ॥ १ ॥

देहात्मज्ञानाचे परि आत्मज्ञान । होतां न बंधन मागुती हो ॥ २ ॥
शमादिकयुक्त ध्याती जे हें खास । अखंडैकरस लाभे तयां ॥ ३ ॥

( ३१ )

यावद्देहपात प्रारब्ध भोगीत । तया जीवन्मुक्ती अलिप्तत्वें ॥ १ ॥
न घटे न वाढे पाप पुण्य होतां । महिमा तत्त्वतां ज्ञानीयाचा ॥२॥
प्रज्ञात्मा होवोनी ह्या देहा सोडोनी । ब्रह्मीं ते मिळोनी जाती
मुक्त ॥ ३ ॥

( ३२ )

ते हृदयग्रंथी तत्काळ तोडीती । संसारा या छेदिती ज्ञानबळें ॥ १ ॥
सर्व पाश त्यांचे तत्काळ तुटती । कर्मे क्षया जाती सर्व त्यांचीं ॥२॥
कोठें देह पडो तयां नको काळ । त्यांचें ज्ञानबळ लोकां तारी ॥ ३ ॥
वासुदेव म्हणे इवरासुताचें । मत मी हें साचें वाचे बोले ॥ ४ ॥
वासुदेव म्हणे वामदेवापरी । जो विचार करी तो हो मुक्त ॥ ५ ॥

## ४१२ मलप्रभेची आरती

जय जय भगवति गंगे जनिमृतिभयभंगे ॥ मलापहारिणि तारिणि उद्धरिं मज वेगें ॥ ध्रु० ॥ भवदवतापें तापुनि व्यापुनि कलुषानें ॥ तूझ्या तीरीं आलों झालों खिन्न मनें ॥ आतां सत्वरि उद्धरिं अंतरिं मन्नमनें ॥ प्रसन्न होउनी शमने दुरितकृतशमने ॥ १ ॥ उपटुनि समूळ पापा तापा शमऊनी ॥ अंतःकरणा शोधुनि लाउनि हरिभजनीं ॥ जननीपरि तू निशिदिनिं सांभाळुनि सदनीं ॥ कैवल्याच्या ठेवीं मजला भवशमनि ॥ २ ॥ शतयोजनिं जो दूरचि राहुनिया गंगा ॥ गंगा ऐसें बोले त्याला जी सुभगा ॥ तत्क्षणि तारी वीक्षणिं येतां जी गंगा ॥ शिवसायुज्या ने ती उद्धरि अघभंगा ॥ ३ ॥

---

## ४१३ भजन

पावनी गंगा । सुभगा । पावनी गंगा ॥ ध्रु० ॥
स्मरतां तत्क्षणि करि अघभंगा । तारी जी भवरोगा ॥ १ ॥
शमवी यज्जल पड्रिपुवेगा । ती हे अमृततरंगा ॥ २ ॥

---

१ ही आरती व भजन मिळण्यास उशीर झाल्यानें शेवटीं छापलें आहे.